राज्य निवडणूक आयोगाच्या नविन प्रशासकीय भवन इमारतीमधील कार्यालयाच्या नुतनीकरण खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२४/३१/प्र.क्र.१३/रानिआ(३७)**

३०७, तिसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ फेब्रुवारी,२०२५

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९
३) राज्य निवडणूक आयोगाचे दि.०३.१२.२०२४, दि.१७.१२.२०२४ व दि.०८.०१.२०२५ रोजीची पत्रे
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र.
   i) जा.क्र.मुअ(मुं) का-२/३७१/ दि.२४.१.२०२४
   ii) जा.क्र.मुअ(मुं)का-२/५४३ /२०२४, दि.२.२.२०२४
   iii) जा.क्र. मुअ(मुं)का-२/ २६९०/२०२४, दि. २९.०५.२०२४
   iv) जा.क्र.मुअ (मुं) का-२/ ४२१०/२०२४, दि.२५.०९.२०२४

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त राज्य निवडणूक आयोगाच्या नविन प्रशासकीय भवन इमारतीमधील कार्यालयाचे नुतनीकरण करण्यास उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी रु.८२,६२,४७०/- (रु. ब्याऐंशी लाख बासष्ट हजार चारशे सत्तर फक्त) (अंदाजीत किंमत) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिलेला प्रस्ताव राज्य निवडणूक आयोगाने संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये प्रसाशकीय व वित्तीय मान्यतेकरिता शासनास सादर केला आहे. सदर रु.८२,६२,४७०/- (रु. ब्याऐंशी लाख बासष्ट हजार चारशे सत्तर फक्त) (अंदाजीत किंमत) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रसाशकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्य निवडणूक आयोगाच्या नविन प्रशासकीय भवन इमारतीमधील कार्यालयाचे नुतनीकरण करण्याकरिता रु.३३,४४,८९७/-, रु.८,३४,४५१/-, रु.२६,१२,९४९/- व रु.१४,७०,१७३/- अशा एकूण रु.८२,६२,४७०/- (रु. ब्याऐंशी लाख बासष्ट हजार चारशे सत्तर फक्त) (अंदाजीत किंमत) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकांस मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तांत्रिक सहमती दर्शविली आहे. त्या अनुषंगाने, खालील ४ कामाकरिता पुढील नमूद खर्चाच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता धरून) देण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **कामाचे स्वरुप (स्थापत्य)** | **आवश्यक निधी रुपये** |
|---|---|---|
| १ | आयोगाच्या १९ व्या मजल्यावरील कार्यालयाचे नूतनीकरण करणे | रु.३३,४४,८९७/- (अंदाजीत) |
| २ | उपायुक्त यांचे दालन नवीन तयार करणे | रु.८,३४,४५१/- (अंदाजीत) |
| ३ | नवीन नियुक्त विधि अधिकारी व अवर सचिव यांच्या नविन दालन तयार करणे | रु.२६,१२,९४९/- (अंदाजीत) |
| ४ | दोन तहसिलदार यांना केबिन तयार करणे | रु.१४,७०,१७३/- (अंदाजीत) |
| एकूण (अक्षरी रु. ब्याऐंशी लाख बासष्ट हजार चारशे सत्तर फक्त) | | रु.८२,६२,४७०/- |

२. सदरचा खर्च, “मागणी क्र.ए-०४, मुख्य लेखाशिर्ष-२०७०, (००) (०८) राज्य निवडणूक आयोग (अनिवार्य), (१३) कार्यालयीन खर्च (२०७० ०६४८)” या लेखाशिर्षाखाली त्या-त्या आर्थिक वर्षात मंजूर उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दि.२०.०९.२०१९ च्या शासन निर्णयातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग-पाच मधील महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ (१) तसेच, सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१३१५३६०९३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2025.02.13 15:37:02 +05'30'

**( क्रांती पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
३. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
४. अधिक्षक अभियंता (सा. बां.) मंडळ, मुंबई
५. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
६. उप अभियंता, दक्षिण (सा. बां.) उपविभाग, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्या/इमा-३,मंत्रालय, मुंबई
१०.सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
११.कक्ष अधिकारी (रोख शाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई (३ प्रती)
१२.निवडनस्ती/रानिआ(३७)